20140725124404730 8

राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, मुंबई संस्थेतील विद्यार्थी प्रवेश क्षमता ४० ने वाढविणेबाबत

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : राप्रसं २००५/ (५६/०५)/ मशि-१
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३० जानेवारी, २००६

प्रस्तावना : भारतीय नागरी स्पर्धात्मक परीक्षेमध्ये (आय.ए.एस./ आय.पी.एस. इत्यादि सेवांकरीता) राज्यातील होतकरु व गुणवान विद्यार्थ्यांना उत्तीर्ण होण्याची संधी उपलब्ध व्हावी या दृष्टीने सन १९७६ मध्ये राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्थेची स्थापना करण्यात आली आहे. या केंद्राची प्रवेश क्षमता सद्य:स्थितीमध्ये ६० आहे. मुंबई केंद्रामध्ये प्रशिक्षण प्रवेशाकरीता प्रतिवर्षी मोठ्या प्रमाणावर प्रवेश अर्ज प्राप्त होतात. तथापि या केंद्राची विद्यार्थी प्रवेश क्षमता केवळ ६० असल्या कारणाने मर्यादित विद्यार्थ्यांनाच प्रवेश मिळू शकतो. त्यामुळे या केंद्राच्या प्रवेश क्षमतेमध्ये वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय : उपरोक्त पार्श्वभूमीवर राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, मुंबई या केंद्राच्या सध्याच्या ६० विद्यार्थी प्रवेश क्षमतेमध्ये जानेवारी, २००६पासून ४० जागांची वाढ करुन सदर केंद्राची विद्यार्थी प्रवेश क्षमता १०० जागांची करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सु.न.जोशी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,
(१) शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
(२) सर्व विभागीय सहसंचालक (उच्च शिक्षण),
(३) संचालक, राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, मुंबई, कोल्हापूर, औरंगाबाद, नागपूर,
(४) मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव,
(५) मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव,
(६) मा.प्रधान सचिव, (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक,
(७) वित्त विभाग/ नियोजन विभाग,,
(८) उच्च व तंत्र शिक्षण विभाग (कार्यासन साशि-१),
(९) निवडनस्ती मशि-१

D:\D Drive\Padma\G R\M S ...doc

165